(सोबत "मुंबई ग्रामपंचायत (सुधारणा) अधिनियम, २०११ (सन २०११ चा महाराष्ट्र अधिनियम क्रमांक २७)" दिनांक १० ऑगस्ट , २०११ ची इंग्रजी व मराठी प्रत, माहिती व आवश्यक त्या कार्यवाहीसाठी अग्रेषित.)

-*-*-*-*-*-

<u>तात्काळ</u>

क्रमांक: संकीर्ण-२०१०/प्र.क्र.७१/पंरा-२,
ग्रामविकास व जलसंधारण विभाग,
मादाम कामा रोड, मंत्रालय, मुंबई-३२.
दिनांक : २६ ऑगस्ट, २०११.

दु.क्र.२२८३९९२४/२२७९३३१०
फॅ.क्र.२२८३१०१७

प्रति,

१) मा. राज्यपाल यांचे सचिव

२) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव

३) मा. उपमुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव

४) सर्व मंत्री /राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव

५) प्रधान सचिव, विधी व न्याय विभाग ,मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२

६) उपायुक्त, राज्य निवडणूक आयोग, नवीन प्रशासकीय इमारत, मुंबई - ४०० ०३२

७) विभागीय आयुक्त (सर्व )

८) जिल्हाधिकारी (सर्व )

९) मुख्य कार्यकारी अधिकारी (सर्व )

१०) संचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय,मंत्रालय, मुंबई

११) संचालक, भाषा संचालनालय, नवीन प्रशासकीय इमारत, वांद्रा, मुंबई - ४०० ०५१

( गजानन पा.लाभे )
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

RNI No. MAHENG/2009/35528




# महाराष्ट्र शासन राजपत्र

# असाधारण भाग आठ

वर्ष ३, अंक २८ (३)] बुधवार, ऑगस्ट १०, २०११/श्रावण १९, शके १९३३ [ पृष्ठे ३, किंमत : रुपये १४.००

असाधारण क्रमांक ८१

## प्राधिकृत प्रकाशन

महाराष्ट्र विधानमंडळाचे अधिनियम व राज्यपालांनी प्रख्यापित केलेले अध्यादेश व केलेले विनियम आणि विधी व न्याय विभागाकडून आलेली विधेयके (इंग्रजी अनुवाद).

In pursuance of clause (3) of article 348 of the Constitution of India, the following translation in English of the Bombay Village Panchayats (Amendment) Act, 2011 (Mah. Act No. XXVII of 2011), is hereby published under the authority of the Governor.

By order and in the name of the
Governor of Maharashtra,

H. B. PATEL,
Secretary to Government,
Law and Judiciary Department.

---

## MAHARASHTRA ACT No. XXVII OF 2011.

*(First published, after having received the assent of the Governor, in the "Maharashtra Government Gazette", on the 10th August 2011)*

An Act further to amend the Bombay Village Panchayats Act, 1958.

WHEREAS both Houses of the State Legislature were not in session;

AND WHEREAS the Governor of Maharashtra was satisfied that circumstances existed which rendered it necessary for him to take immediate action further to amend the Bombay Village Panchayats Act, 1958, for the purposes hereinafter appearing; and, therefore, promulgated the Bombay Village Panchayats (Amendment) Ordinance, 2011, on the 8th June 2011;

Bom. III of 1959. Mah. Ord. XV of 2011.

AND WHEREAS it is expedient to replace the said Ordinance by an Act of the State Legislature; it is hereby enacted in the Sixty-second Year of the Republic of India as follows:—

Short title and commencement.

**1.** (*1*) This Act may be called the Bombay Village Panchayats (Amendment) Act, 2011.

(2) It shall be deemed to have come into force on the 8th June 2011.

Amendment of section 10-1A of Bom. III of 1959.

**2.** In section 10-1A of the Bombay Village Panchayats Act, 1958 (hereinafter referred to as "the principal Act"), for the existing provisos, the following provisos shall be substituted, namely :— Bom. III of 1959.

" Provided that, for the General or bye-elections for which the last date of filing of nomination falls on or before the 31st December 2011, in accordance with the election programme declared by the State Election Commission, a person who has applied to the Scrutiny Committee for verification of his Caste Certificate before the date of filing of the nomination papers but who has not received the Validity Certificate on the date of filing of the nomination papers shall submit, alongwith the nomination papers,—

(*i*) a true copy of the application preferred by him to the Scrutiny Committee for issuance of the Validity Certificate or any other proof of having made such application to the Scrutiny Committee ; and

(*ii*) an undertaking that he shall submit, within a period of four months from the date on which he is declared elected, the Validity Certificate issued by the Scrutiny Committee :

Provided further that, if the person fails to produce the Validity Certificate within a period of four months from the date on which he is declared elected, his election shall be deemed to have been terminated retrospectively and he shall be disqualified for being a member.".

Amendment of section 30-1A of Bom. III of 1959.

**3.** In section 30-1A of the principal Act, for the existing provisos, the following provisos shall be substituted, namely :—

" Provided that, for the General or bye-elections for which the last date of filing of nomination falls on or before the 31st December 2011, in accordance with the election programme declared by the State Election Commission, a person who has applied to the Scrutiny Committee for verification of his Caste Certificate before the date of filing of the nomination papers but who has not received the Validity Certificate on the date of filing of the nomination papers shall submit, alongwith the nomination papers,—

(*i*) a true copy of the application preferred by him to the Scrutiny Committee for issuance of the Validity Certificate or any other proof of having made such application to the Scrutiny Committee ; and

(*ii*) an undertaking that he shall submit, within a period of four months from the date on which he is declared elected, the Validity Certificate issued by the Scrutiny Committee :

Provided further that, if the person fails to produce the Validity Certificate within a period of four months from the date on which he is declared elected, his election shall be deemed to have been terminated retrospectively and he shall be disqualified for being a *Sarpanch*.".

Mah. Ord. XV of 2011. **4.** (*1*) The Bombay Village Panchayats (Amendment) Ordinance, 2011, is hereby repealed. Repeal of Mah. Ord. XV of 2011 and saving.

(*2*) Notwithstanding such repeal, anything done or any action taken (including any notification or order issued) under the principal Act, as amended by the said Ordinance, shall be deemed to have been done, taken or, as the case may be, issued under the corresponding provisions of the principal Act, as amended by this Act.

ON BEHALF OF GOVERNMENT PRINTING, STATIONERY AND PUBLICATION, PRINTED AND PUBLISHED BY SHRI PARSHURAM JAGANNATH GOSAVI, PRINTED AT GOVERNMENT CENTRAL PRESS, 21-A, NETAJI SUBHASH ROAD, CHARNI ROAD, MUMBAI 400 004 AND PUBLISHED AT DIRECTORATE OF GOVERNMENT PRINTING, STATIONERY AND PUBLICATION, 21-A, NETAJI SUBHASH ROAD, CHARNI ROAD, MUMBAI 400 004. EDITOR : SHRI PARSHURAM JAGANNATH GOSAVI.

RNI No. MAHBIL/2009/35530




# महाराष्ट्र शासन राजपत्र
# असाधारण भाग चार

वर्ष ३, अंक १८(३)] बुधवार, ऑगस्ट १०, २०११/श्रावण १९, शके १९३३ [ पृष्ठे ३, किंमत : रुपये २०.००

**असाधारण क्रमांक ५३**

**प्राधिकृत प्रकाशन**

**महाराष्ट्र विधानमंडळाचे अधिनियम व राज्यपालांनी प्रख्यापित केलेले अध्यादेश व केलेले विनियम.**

**अनुक्रमणिका**



दिनांक १० ऑगस्ट २०११ रोजी मा. राज्यपालांनी संमती दिलेला महाराष्ट्र विधानमंडळाचा पुढील अधिनियम माहितीसाठी, याद्वारे, प्रसिद्ध करण्यात येत आहे.

**ह. बा. पटेल,**
सचिव,
महाराष्ट्र शासन,
विधी व न्याय विभाग.

---

**सन २०११ चा महाराष्ट्र अधिनियम क्रमांक २७.**

(मा. राज्यपालांची संमती मिळाल्यानंतर **"महाराष्ट्र शासन राजपत्रात"** दिनांक १० ऑगस्ट २०११ रोजी प्रथम प्रसिद्ध केलेला अधिनियम.)

## मुंबई ग्रामपंचायत अधिनियम, १९५८ यात आणखी सुधारणा करण्यासाठी अधिनियम.

१९५९ चा मुंबई ३. **ज्याअर्थी,** राज्य विधानमंडळाच्या दोन्ही सभागृहांचे अधिवेशन चालू नव्हते ;

**आणि ज्याअर्थी,** यात यापुढे दिलेल्या प्रयोजनांसाठी, मुंबई ग्रामपंचायत अधिनियम, १९५८ यात आणखी सुधारणा करण्यासाठी महाराष्ट्राच्या राज्यपालांनी, तात्काळ कार्यवाही करणे जीमुळे आवश्यक व्हावे अशी परिस्थिती अस्तित्वात असल्याबद्दल त्यांची खात्री पटली होती ; **आणि,**

२०११ चा महा. अध्या. १५. म्हणून, त्यांनी दिनांक ८ जून २०११ रोजी मुंबई ग्रामपंचायत (सुधारणा) अध्यादेश, २०११ प्रख्यापित केला होता ;

**आणि ज्याअर्थी,** उक्त अध्यादेशाचे राज्य विधानमंडळाच्या अधिनियमात रूपांतर करणे इष्ट आहे ; **त्याअर्थी,** भारतीय गणराज्याच्या बासष्टाव्या वर्षी, याद्वारे, पुढील अधिनियम करण्यात येत आहे :—

संक्षिप्त नाव व प्रारंभ.

**१.** (१) या अधिनियमास, मुंबई ग्रामपंचायत (सुधारणा) अधिनियम, २०११ असे म्हणावे.

(२) तो, दिनांक ८ जून २०११ रोजी अंमलात आला असल्याचे मानण्यात येईल.

सन १९५९ चा मुंबई अधिनियम क्रमांक ३ याच्या कलम १०-१क ची सुधारणा.

**२.** मुंबई ग्रामपंचायत अधिनियम, १९५८ (यात यापुढे ज्याचा निर्देश " मुख्य अधिनियम " असा करण्यात आला आहे), याच्या कलम १०-१क मधील, विद्यमान परंतुकांऐवजी, पुढील परंतुके दाखल करण्यात येतील :— १९५९ चा मुंबई ३.

" परंतु, राज्य निवडणूक आयोगाने जाहीर केलेल्या निवडणूक कार्यक्रमानुसार सार्वत्रिक किंवा पोट-निवडणुकांकरिता नामनिर्देशनपत्र भरण्याचा शेवटचा दिनांक ३१ डिसेंबर २०११ हा किंवा त्यापूर्वीचा असेल, मात्र, जिने नामनिर्देशनपत्र भरण्याच्या दिनांकापूर्वी, आपल्या जातीच्या प्रमाणपत्राच्या पडताळणीसाठी पडताळणी समितीकडे अर्ज केलेला असेल, परंतु जिला नामनिर्देशनपत्र भरण्याच्या दिनांकाला वैधता प्रमाणपत्र मिळालेले नसेल अशी व्यक्ती, नामनिर्देशनपत्रासोबत,—

(एक) वैधता प्रमाणपत्र देण्यासाठी तिने पडताळणी समितीकडे सादर केलेल्या अर्जाची सत्य प्रत किंवा पडताळणी समितीकडे तिने असा अर्ज केला असल्याबद्दलचा अन्य कोणताही पुरावा ; आणि

(दोन) ती निवडून आल्याचे घोषित झाल्याच्या दिनांकापासून चार महिन्यांच्या मुदतीत, पडताळणी समितीने दिलेले वैधता प्रमाणपत्र ती सादर करील याबद्दलचे हमीपत्र,

सादर करील :

परंतु आणखी असे की, त्या व्यक्तीने, ती निवडून आल्याचे घोषित झाल्याच्या दिनांकापासून चार महिन्यांच्या मुदतीत वैधता प्रमाणपत्र सादर करण्यात कसूर केल्यास, तिची निवड भूतलक्षी प्रभावाने रद्द झाली असल्याचे मानण्यात येईल आणि ती, सदस्य राहण्यास निरर्ह ठरेल. ".

सन १९५९ चा मुंबई अधिनियम क्रमांक ३ याच्या कलम ३०-१क ची सुधारणा.

**३.** मुख्य अधिनियमाच्या कलम ३०-१क मधील, विद्यमान परंतुकांऐवजी, पुढील परंतुके दाखल करण्यात येतील :—

" परंतु, राज्य निवडणूक आयोगाने जाहीर केलेल्या निवडणूक कार्यक्रमानुसार सार्वत्रिक किंवा पोट-निवडणुकांकरिता नामनिर्देशनपत्र भरण्याचा शेवटचा दिनांक ३१ डिसेंबर २०११ हा किंवा त्यापूर्वीचा असेल, मात्र, जिने नामनिर्देशनपत्र भरण्याच्या दिनांकापूर्वी, आपल्या जातीच्या प्रमाणपत्राच्या पडताळणीसाठी पडताळणी समितीकडे अर्ज केलेला असेल, परंतु जिला नामनिर्देशनपत्र भरण्याच्या दिनांकाला वैधता प्रमाणपत्र मिळालेले नसेल अशी व्यक्ती, नामनिर्देशनपत्रासोबत,—

(एक) वैधता प्रमाणपत्र देण्यासाठी तिने पडताळणी समितीकडे सादर केलेल्या अर्जाची सत्य प्रत किंवा पडताळणी समितीकडे तिने असा अर्ज केला असल्याबद्दलचा अन्य कोणताही पुरावा ; आणि

(दोन) ती निवडून आल्याचे घोषित झाल्याच्या दिनांकापासून चार महिन्यांच्या मुदतीत, पडताळणी समितीने दिलेले वैधता प्रमाणपत्र ती सादर करील याबद्दलचे हमीपत्र,

सादर करील :

परंतु आणखी असे की, त्या व्यक्तीने, ती निवडून आल्याचे घोषित झाल्याच्या दिनांकापासून चार महिन्यांच्या मुदतीत वैधता प्रमाणपत्र सादर करण्यात कसूर केल्यास, तिची निवड भूतलक्षी प्रभावाने रद्द झाली असल्याचे मानण्यात येईल आणि ती, सरपंच राहण्यास निरर्ह ठरेल. ".

२०११ चा महा. अध्या. १५.

**४.** (१) मुंबई ग्रामपंचायत (सुधारणा) अध्यादेश, २०११ हा, याद्वारे, निरसित करण्यात येत आहे. सन २०११ चा महाराष्ट्र अध्यादेश क्रमांक १५ याचे निरसन व व्यावृत्ती.

(२) असे निरसन झाले असले तरीही, उक्त अध्यादेशाद्वारे सुधारणा करण्यात आलेल्या मुख्य अधिनियमान्वये करण्यात आलेली कोणतीही कृती किंवा कोणतीही कार्यवाही (काढलेली कोणतीही अधिसूचना किंवा दिलेला कोणताही आदेश यांसह) ही, या अधिनियमाद्वारे सुधारणा करण्यात आलेल्या मुख्य अधिनियमाच्या तत्सम तरतुदींन्वये करण्यात आलेली कोणतीही कृती किंवा कार्यवाही किंवा, यथास्थिति, काढलेली अधिसूचना वा आदेश असल्याचे मानण्यात येईल.

ON BEHALF OF GOVERNMENT PRINTING, STATIONERY AND PUBLICATION, PRINTED AND PUBLISHED BY SHRI PARSHURAM JAGANNATH GOSAVI, PRINTED AT GOVERNMENT CENTRAL PRESS, 21-A, NETAJI SUBHASH ROAD, CHARNI ROAD, MUMBAI 400 004 AND PUBLISHED AT DIRECTORATE OF GOVERNMENT PRINTING, STATIONERY AND PUBLICATION 21-A, NETAJI SUBHASH ROAD, CHARNI ROAD, MUMBAI 400 004, EDITOR : SHRI PARSHURAM JAGANNATH GOSAVI.